आधार प्रकल्प (Unique Identity) राबविण्यासाठी
सेतु महाराष्ट्र सोसायटीला अनुदान मंजूर
करणेबाबत

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
माहिती तंत्रज्ञान संचालनालय
शासन निर्णय क्र. मातंसं/२०१०/प्रक्र १०९/३९
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक ३० एप्रिल, २०११

वाचा:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण २०१०/प्रक्र १०/१८
२)कैंद्र सरकार, वित्त विभाग पत्र क्र. एफ ३३(२)एफडीसी/२०१०, दि. २१ जुलै २०१०
३ )शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.मातंसं २०१०/प्र.क्र.७१/३९, दि. ९.९.२०१०
४)शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. २०१०/प्र.क्र.४८/३९, दि. २८.१.२०११
५) शासन निर्णय क्र. मातंसं/२०१०/प्रक्र १०९/३९, दि. २४ फेब्रुवारी, २०११
६) शासन राजपत्र भाग-४, दि. ३१ मार्च २०११ "महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान विधेयक, २०११"

**प्रस्तावना:-**

१३ व्या वित्त आयोगांतर्गत विशिष्ट ओळखपत्र (UID) या प्रयोजनासाठी सन २०१०-११ ते २०१४-१५ या पांच वर्षाच्या कालावधीत प्रतीवर्षी रु. ६३.४८ कोटी प्रमाणे एकुण रु. ३१७.४० कोटी इतका निधी प्राप्त होणार आहे. सन २०११-१२ मधील अपेक्षित रु. ६३.४८ कोटीचा निधी मंजूर करण्यात आलेला आहे. त्यापैकी रु. १.२० कोटी (रुपये एक कोटी वीस लाख फक्त) इतका निधी सन २०११-१२ या वित्तीय वर्षाच्या पहिल्या दोन महिन्यासाठी (एप्रिल, मे) शासन राजपत्र भाग-४, दि. ३१ मार्च २०११ "महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान विधेयक, २०११" अन्वये मंजूर करण्यात आला आहे. तो मागणी क्र. ए-०४, २०५२-सचिवालय-सर्वसाधारण सेवा-०९०-सचिवालय(००)(१४)नागरिकांना युनिक ओळखपत्राचे वाटप (२०५२५०३६) ५० इतर खर्च या लेखाशिर्षात जमा करण्यात आलेला आहे.

**शासन निर्णय:-**

क्र.३ वरील शासन निर्णयानुसार कैंद्र शासनाकडुन आधार प्रकल्पासाठी उपलब्ध होणारा निधी महाराष्ट्र सेतु सोसायटीत जमा करुन तो गरजेनुसार जिल्हा सेतु सोसायटी व नगर पालिकांना वितरीत करावयाचा आहे त्यासाठी कैंद्र शासनाकडुन प्राप्त झालेला निधी रु. १.२० कोटी (रुपये एक कोटी वीस लाख फक्त) पैकी रु. ०.६० कोटी (रुपये साठ लक्ष) एप्रिल महिन्या करिता राज्य सेतु सोसायटीला पुढील कार्यवाही करण्यासाठी अदा करण्याचे आदेशित करण्यात येत आहे. यासाठी संचालक, माहिती तंत्रज्ञान यांना नियंत्रक

अधिकारी व कक्ष अधिकारी रोख शाखा, माहिती तंत्रज्ञान यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. १३९/११/अर्थ-१४, दि. १५.२.२०११ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक २०११०४३०११४९१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**(डॉ.संतोष भोगले)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

प्रत,
मा.राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
महालेखापाल-१( लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर
महालेखापाल-१( लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर
उपमहासंचालक, विशिष्ठ ओळख प्राधिकरण क्षेत्रिय कार्यालय, मुंबई
अधिदान व लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
शासनाचे मुख्य सचिव / अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/सचिव
विकास आयुक्त,उद्योग/ सर्व जिल्हाधिकारी / जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व महानगरपालिका आयुक्त
वित्त विभाग, कार्यासन अर्थसंकल्प-१४, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती कार्या-३९